राष्ट्रीय सेवा योजना

स्वयंसेवकांना राष्ट्रीय सेवा योजनेत प्रवेश देण्यासाठी नियमावली व नियमित उपक्रम आणि विशेष शिबिराची मार्गदर्शक तत्वे.

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांकः रासेयो-२०१४/प्र.क्र.४२/१४/साशि-७

मंत्रालय कक्ष, एलफिन्स्टन तंत्र विद्यालय परिसर, मुंबई ४०० ००१

तारीख : ६ सप्टेंबर,२०१४

प्रस्तावना

उपक्रम राबविण्यासाठी व दत्तक गावाची निवड करताना काही मार्गदर्शक तत्वे असावी. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या सल्लागार समितीच्या सभेत चर्चा झाल्याप्रमाणे राष्ट्रीय सेवा योजनेमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देताना संदिग्धता दिसून येते. राष्ट्रीय सेवा योजेमध्ये विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतल्यानंतर २ वर्षात त्यांचा सर्वागिण विकास होतो. जसे सभाधारिष्ठ, सुप्त गुणांना वाव मिळून अनेक विद्यार्थी सर्वगुणसंपन्न होतात. भावी काळात अत्यंत यशस्वी नागरिक म्हणून गौरविले जातात. राष्ट्रीय सेवा योजनेच्या स्थापनेपासून आजपावेतो ही योजना उत्कृष्ठपणे राबविली जाते. दरवर्षी रासेयोमध्ये विद्यार्थी स्वयंसेवक म्हणून नव्याने समाविष्ठ होतात. सर्व विद्यार्थ्यांना योग्य न्याय देण्यासाठी एक नियमावली तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

तसेच समाजभिमुख उपक्रम राबविण्यासाठी व दत्तक गावाची निवड करताना काही मार्गदर्शक तत्वे असावी. ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय—

स्वयंसेवकांना राष्ट्रीय सेवा योजनेमध्ये प्रवेश देण्यासाठी नियमावली :

१) स्वयंस्फुर्तीने प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा समावेश प्रथम असावा.

२) प्रवेश देताना अनुसूचित जाती व जमातीतील विद्यार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे.

३) विद्यार्थ्यांना एका शैक्षणिक वर्षामध्ये एकाच योजनेमध्यचे प्रवेश असावा.
उदा.एन.सी.सी./एन.एस.एस./विस्तार व निरंतर शिक्षण विभाग इत्यादी.

४) विद्यार्थ्यांची निवड करताना त्याने/तिने महाविद्यालय किंवा स्वयंसेवी संस्था स्तरावर सामाजिक कार्याशी निगडीत प्रकल्प देवून प्रकल्पाच्या मुल्यमापनावर आधारित प्रवेश देण्यात यावा.किंवाकार्यक्रम अधिकाऱ्याने तीन सलग कार्यक्रमकांचे आयोजन करुन सर्व कार्यक्रमामध्ये सक्रीय सहभाग असणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रवेश दयावा.

५) + २ स्तर, पदवी आणि पदव्यूत्तर विभागातील विद्यार्थ्यांना रासेयोमध्ये प्रवेश देताना यापूर्वी रासेयोतील सहभाग असणाऱ्या विद्यार्थ्यांना प्राधान्य दयावे.

६) रासेयोमध्ये प्रवेश देताना विशेष विद्यार्थ्यांना (अंध, अपंग, शारीरिकदृष्ट्या विकलांग) प्राधान्य देण्यात यावे.

७) रासेयोमध्ये प्रवेश देताना कमी अवधान (अबोल, बुजरा नेतृत्व गुण नसारा इ.) असलेल्या विद्यार्थ्यांना प्राधान्य दयावे. ज्यायोगे दोन वर्षानंतर तो अष्टावधानी होऊ शकेल.)

८) सर्व शाखेतील विद्यार्थ्यांना समान संधी देण्यात यावी.

९) रासेयोमध्ये प्रवेश देताना मुले व मुली यांना समान संधी देण्यात यावी.

१०) विद्यार्थी राष्ट्रीय भावनेत प्रेरित असलेल्या सामाजिक बांधिलकी जपणारा असावा.

११) रासेयोमध्ये प्रवेश देताना अल्पसंख्यांक विद्यार्थ्याना प्रोत्साहन देण्यात यावे.

१२) विद्यार्थी व्यसनाधीन नसावा तसेच शिस्तप्रिय असावा.

१३) रासेयोमध्ये प्रवेश देताना विद्यार्थ्याचे वय २५ पेक्षा जास्त असू नये. यामध्ये मागासवर्गीय विद्यार्थ्यांना वयोमर्यादेमध्ये तीन वर्षाची सूट देण्यात यावी.

१४) रासेयोमध्ये प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना सात दिवसाचे निवासी शिबिर करणे बंधनकारक आहे.

<u>नियमित कार्यक्रमाची मार्गदर्शक तत्वे</u>

१) रासेयो उपक्रम हे २ वर्षामध्ये प्रतिवर्षी १२० तास म्हणजे एकूण २४० तास व दोन्ही वर्षात मिळून एक सात दिवसीय निवासी शिबिर.

२) प्रथम वर्ष रासेयो स्वयंसेवकासाठी तासाची विभागणी-
- २० तास उदबोधन सत्र ( Orientation Programme)
- २० तास महाविद्यालयस्तर उपक्रम
- २० तास विद्यापीठाने पुढाकार घेतलेले उपक्रम
- ६० तास वस्ती पातळीवरील दत्तक गाव येथे राबविण्यासाठी उपक्रम (कमीत कमी २ उपक्रम असावेत व उपक्रमांच्या तासांची मर्यादा कमीत कमी २० व जास्तीत जास्त ६० तास इतकी असावी)

३) द्वितीय वर्ष रासेयो स्वयंसेवकांसाठी तासांची विभागणी-
- २० तास महाविद्यालय स्तरावरील कार्यक्रम/उजळणी
- २० तास विद्यापीठाने पुढाकार घेतलेले उपक्रम
- ८० तास वस्ती पातळीवरील दत्तक गाव/खेडे येथील उपक्रम

४) रासेयो स्वयंसेवकांकरीता उदबोधन सत्र अंतर्गत खालील उपक्रमांचा समावेश असावा.

- रासेया विषयी सर्वसाधारण उदबोधन (रासेयोचा इतिहास, रासेयो जडणघडण, रासेयो उद्दिष्टे, ध्येय याविषयी मार्गदर्शन)
- विशेष उपक्रमविषयीचे उदबोधन
- कौशल्यावर आधारीत उदबोधन
- विशेष शिबिरांसाठी उदबोधन

५) महाविद्यालयस्तर उपक्रम -

- सदर उपक्रम दरम्यान विद्यार्थ्यांना श्रमप्रतिष्ठा शिकविणारे उपक्रम राबविण्यात यावेत.
- महाविद्यालय परिसर विकसित करण्यासाठीचे उपक्रम- उदा. क्रिडांगण तयार करणे, वृक्षारोपन, उर्जा लेखा-जोखा (Energy Audit), पर्यावरण संवर्धन, वृक्षगणना, हटिंग हजार्ड ( धोके शोध मोहिम) इत्यादी.

६) विद्यापीठाने पुढाकार घेवून योजलेले उपक्रम-

- उदा. समर्थ भारत अभियान, मुनीजन ग्राम अभियान, ऊर्जा संवर्धन, कन्यारत्न अभियान, रस्ता सुरक्षा अभियान, रासेयो प्रचार व प्रसार सप्ताह इत्यादी.
- विद्यापीठ सल्लागार समितीने सूचविलेल्या विशेष मोहिमा/उपक्रम

(७) खेडे/दत्तकगाव पातळीवरील उपक्रम -

- स्वयंसेवकांना समाजामधील विविध प्रश्नांची जाणीव होणे व त्या संदर्भात उपक्रम राबविण्यासाठी जास्तीत जास्त तास वसती पातळीवरील उपक्रमांकरीता राखून ठेवण्यात आले आहे. सदर उपक्रमांमधून विद्यार्थी व व्यक्तीमध्ये एक सामाजिक बंध निर्माण होवून विद्यार्थ्यांना त्यांचे प्रश्न समजण्यास मदत होते व ते प्रश्न सोडविताना विद्यार्थ्यांमध्ये आत्मविश्वास व व्यक्तिमत्व विकास घडण्यास मदत होईल असे उपक्रम राबविण्यात यावेत.
- सामाजिक स्वयंसेवी संस्थामार्फत वसतिपातळीवरील विविध प्रश्नांवर कार्यक्रम/उपक्रम उदा.वृध्दाश्रम, अनाथाश्रम, निवासी सामाजिक उपक्रम करणाऱ्या संस्था.

- ग्राम विकासाचे उपक्रम- उदा. साक्षरता, जल व माती व्यवस्थापन, शेती विषयक उपक्रम, आरोग्य, बालसंगोपन, बचत गट, रस्ते बांधणी किंवा दुरस्तीकरण.

८) शहरी भागातील उपक्रम-

- साक्षरता, वसतिविकास, स्वच्छता, नागरी, सुरक्षा, अनाथालये, सार्वजनिक इस्पितळे, लोकसंख्या शिक्षण, नशाबंदीउपक्रम, एडस् प्रतिबंधक उपक्रम इत्यादी कार्यक्रमांतून सहभाग.

९) राष्ट्रीय व नैसर्गिक/मानवनिर्मित आपत्ती व्यवस्थापनाचे उपक्रम.

- भूकंप, पूर, वादळ, अतिवृष्टी, दुष्काळ, गारपीठ, बॉम्बस्फोट इत्यादि नैसर्गिक व मानवनिर्मित आपत्ती व्यवस्थापन.

१०) राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय महत्वाचे दिवस व सप्ताह रासेयो अंतर्गत महाविद्यालयात साजरे करणे.

<u>विशेष शिबिराची मार्गदर्शक तत्वे</u>

विशेष शिबिर हा राष्ट्रीय सेवा योजनेचा आत्मा असल्यामुळे शिबिराचे नियोजन, आयोजन व यशस्वीरित्या पूर्तता हा अत्यंत महत्वाचा भाग आहे. शिबिर हा राष्ट्रीय सेवा योजनेचा अविभाज्य घटक आहे. या शिबिरात युवकांसाठी खूप चांगल्या प्रकारची संधी आहे. कारण यामध्ये विद्यार्थ्यांना एकत्र राहणे, एकमेकांच्या अनुभवाची देवाण-घेवाण करणे. सतत सामाजिक गोष्टींच्या चर्चेद्वारे विचार-विनिमय करणे, सामाजिक प्रश्नांची चर्चा करुन ते प्रश्न, समस्या, अडचणी यावर उपाय शोधण्यासाठी प्रयत्न करणे. राष्ट्रीय सेवा योजनेत असलेल्या संख्येच्या ५० टक्के स्वयंसेवक विशेष शिबिरात सहभागी होतात व इतक्या मोठया प्रमाणात असणाऱ्या या युवकांच्या माध्यमातून फार मोठया प्रमाणात दर्जेदार व उत्कृष्ट असे काम उभे राहू शकते.

<u>शिबिराचा उद्देश</u> : विशेष शिबिर देशपातळीवरील विविध प्रगतीच्या दृटीने महत्वाचे असणाऱ्या विषयाचा गाव पातळीवर अवलंब होण्यासाठी केला जातो. आजपर्यंत विशेष शिबिराच्या माध्यमातून युवक व खेड्यांचा विकास "बलशाली भारतासाठी सृदृढ युवक", "राष्ट्रीय एकात्मता व सामाजिक एकात्मता", "साक्षरता व युवक", "खेड्यांच्या पुर्नःबांधणीत युवकांचा सहभाग", "निर्मल ग्राम स्वच्छता अभियान व युवक", " शास्वत प्रगतीसाठी युवक", यामध्ये सी.सी.टी.व्ही., पाणी व व्यवस्थापन व नियोजन, नापीक जमीन व्यवस्थापन, वृक्षारोपण, बंधारे बांधणे, एडस् जनजागृती इत्यादि संकल्पना राबविल्या आहेत.

सन २०१४-१५ करिता "जल व्यवस्थापन" अशी केंद्रीय संकल्पना देण्यात येत आहे.

- शिबिरात जेवण हे साधे, रुचकर व स्वयंसेवकांच्या मदतीने बनविलेले असावे.
- दत्तक गावाच्या आवश्यकतेनुसार व लोकांच्या गरजेनुसार लोकांच्या सहभागातून उपक्रम राबवावेत.

शिबिरातील कार्यक्रम

१. शिबिरातील दिनचर्या ही ग्रामीण भागाशी मिळती-जुळती व स्वयंसेवकांच्या दृष्टीने हितकारक असावी. त्यामुळे शिबिरात शिस्त व सक्रिय सहभाग राहील.
२. विशेष शिबिर हे ग्रामस्थांशी सुसंवाद व त्यांच्यामधून अनेकविध गोष्टींचा अभ्यास करण्यासाठी असावे.
३. श्रमदान, सांस्कृतिक, बौध्दिक कार्यक्रमांद्वारे स्वयंसेवक व ग्रामस्थांना एकत्रित आणण्याचा प्रयत्न असावा.
४. शासकीय/निमशासकीय/स्वयंसेवी/स्थानिक मंडळ/सामाजिक कार्य संस्था यांचा सहभाग घ्यावा.
५. शिबिर पूर्वतयारी म्हणून सहभागी होणाऱ्या स्वयंसेवकांच्या पालकांची बैठक आयोजित करावी.
६. प्राचार्य, सल्लागार समिती व विद्यापीठ कार्यक्रम समन्वयक यांच्यामध्ये समन्वयन साधणे.

राष्ट्रीय सेवा योजना वार्षिक उपक्रमांचे/विशेष दिवस/सप्ताह यांचे नियोजन

| महिना | उपक्रम |
|---|---|
| जून | १. ५ जून- जागतिक पर्यावरण दिवस.<br>२. कार्यक्रम अधिकारी नियोजन बैठक.<br>३. रा.से.यो.स्वयंसेवकाचे नोंदणी अर्ज व इतर आवश्यक माहिती.<br>४. आव्हान आपत्ती व्यवस्थापन प्रशिक्षण शिबिराचे आयोजन. |
| जुलै | १. ११ जुलै -- जागतिक लोकसंख्या दिवस.<br>२. १ ते ७ जुलै -- वन महोत्सव सप्ताह.<br>३. ८ ते १४ जुलै -- आंतरराष्ट्रीय साक्षरता सप्ताह. |

| | |
|---|---|
| | ४. विद्यार्थ्यांची रा.से.यो. उपक्रमात नोंदणी<br>५. कार्यक्रम अधिकाऱ्यांसाठी प्रशिक्षण वर्ग.<br>६. नियमित उपक्रमांचा आरंभ |
| ऑगस्ट | १. १५ ऑगस्ट -- स्वतंत्रता दिवस<br>२. २० ऑगस्ट -- सदभावना दिवस<br>३. रा.से.यो.मधील विद्यार्थ्यांची नोंदणी पूर्ण करणे.<br>४. स्वयंसेवकांसाठी उद्बोधन सत्र.<br>५. गटनिहाय उपक्रमांचे नियोजन.<br>६. महाविद्यालयीन स्तरावर सल्लागार समितीचे गठन व बैठक<br>७. नेतृत्वगुण विकास शिबिराचे आयोजन (पाच दिवसीय)<br>८. दत्तक गाव निवड |
| सप्टेंबर | १. ११ सप्टेंबर -- आंतरराष्ट्रीय साक्षरता दिवस.<br>२. १५ सप्टेंबर -- आंतरराष्ट्रीय शांतता दिवस.<br>३. २४ सप्टेंबर -- रा. से. यो. दिवस.<br>४. विद्यापीठांकडे स्वयेसेवक नोंदणी यादी पाठविणे.<br>५. २४ सप्टेंबर ते २ ऑक्टोबर -- राष्ट्रीय सेवा योजना प्रचार व प्रसार सप्ताह साजरा करणे.<br>६. दत्तक गाव निवड<br>७. सात दिवसीय निवासी शिबिराचे नियोजन.<br>८. अर्धवार्षिक अहवाल तयार करुन विद्यापीठाकडे सादर करणे.<br>९. नियमित कार्यक्रम व विशेष शिबिरासाठी अनुदानाचे प्रस्ताव विद्यापीठाकडे पाठविणे.<br>१०. प्रजासत्ताक दिन संचलन व उत्कर्ष - सामाजिक व सास्कृतिक महोत्सवासाठी स्वयंसेवकांची निवड . |
| ऑक्टोबर | १. १ ऑक्टोबर -- राष्ट्रीय रक्तदान दिवस.<br>२. २ ऑक्टोबर -- गांधी जयंती/आंतरराष्ट्रीय अहिंसा दिवस.<br>३. दिवाळी सुट्टी दरम्यान शिबिरांचे आयोजन. |

| | |
|---|---|
| | ४. राज्यस्तरीय/पश्चिम विभागीय/साहसी क्रिडा/ युवा महोत्सव / मेगा शिबिर/ राष्ट्रीय एकात्मता शिबिर इत्यादीसाठी स्वयंसेवकांची निवड व प्रोत्साहित करणे. |
| नोव्हेंबर | १. १९ नोव्हेंबर -- राष्ट्रीय आदानप्रदान दिवस.<br>२. १९ ते २५ नोव्हेंबर -- कौमी एकता सप्ताह.<br>३. कौमी एकता सप्ताह साजरा करणे.<br>४. हिवाळी शिबिर आयोजित करणे.<br>५. आयोजित हिवाळी शिबिरांचे लेखे सादर करणे.<br>६. अर्धवार्षिक कार्यमक्रम अधिकाऱ्यांची आढावा बैठक. |
| डिसेंबर | १. १ डिसेंबर -- जागतिक एडस् दिवस.<br>२. १० डिसेंबर -- जागतिक मानव अधिकार दिवस.<br>३. जागतिक एडस् दिवस/सप्ताह मधील उपक्रमांचे आयोजन.<br>४. नाताळ सुट्टीतील विशेष शिबिरांचे आयोजन.<br>५. उत्कर्ष -- सामाजिक, सांस्कृतिक महोत्सवाचे आयोजन. |
| जानेवारी | १. १२ जानेवारी -- राष्ट्रीय युवा दिवस.<br>२. २६ जानेवारी -- प्रजासत्ताक दिवस<br>३. ३० जानेवारी -- हुतात्मा दिवस.<br>४. १२ ते १९ जानेवारी -- राष्ट्रीय युवा सप्ताह.<br>५. तिमाही अहवाल पाठविणे.<br>६. राष्ट्रीय युवा महोत्सवामध्ये विद्यार्थ्यांनी सहभागी होण्यासाठी प्रोत्साहित करणे. |
| फेब्रुवारी | १. १० गुण/१२० तास उपक्रमांची पडताळणी सत्र व १२० तास पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांची यादी आणि अहवाल सादर करणे.<br>२. २४० तास व शिबिरांचे प्रमाणपत्रासाठी यादी सादर करणे.<br>३. इंदिरा गांधी राष्ट्रीय व राज्यस्तरीय पुरस्कारासाठी एकक/कार्यक्रम अधिकारी व स्वयंसेवकांचे प्रस्ताव पाठविणे.<br>४. नियमित कार्यक्रम व विशेष शिबिरांचे परिक्षित लेखांचे सादरीकरण.<br>५. कार्यक्रम अधिकाऱ्यांचा मुल्यमापन सत्रांचे आयोजन. |

| | |
|---|---|
| मार्च | १. ८ मार्च -- आंतरराष्ट्रीय महिला दिवस.<br>२. १० गुणांसाठी प्रमाणित याद्या परीक्षा विभागाकडे सादरीकरण.<br>३. अपरिहार्य कारणांमुळे परिक्षित लेखे सादर न करणाऱ्या महाविद्यालयांना लेखे सादर करण्याची अंतिम मुदत.<br>४. सल्लागार समितीची बैठक. |
| एप्रिल | १. ७ एप्रिल -- जागतिक आरोग्य दिवस.<br>२. ग्रीष्मकालीन ((Theme/Base) शिबिरांचे आयोजन. |
| मे | १. २१ मे -- आंतकवाद विरोधी दिवस.<br>२. ३१ मे --जागतिक धुम्रपान विरोधी दिवस.<br>३. राज्यस्तरीय आव्हान आपत्ती व्यवस्थापन प्रशिक्षण शिबिरांकरीता विद्यार्थ्यांची निवड प्रक्रिया.<br>४. रा.से.यो.मधील वित्तीय वर्षातील स्वयंसेवकांसाठी प्रोत्साहनपर विशेष उपक्रम. |

राष्ट्रीय सेवा योजनेच्या उपक्रमाची योग्यरितीने अंमलबजावणी व्हावी. यासाठी ही नियमावली तयार करण्यात आली असून ही सर्व मार्गदर्शक तत्वे आहेत. या आधारावर उपक्रम राबविले जावेत या दृष्टीने ही नियमावली तयार करण्याचा राज्य शासनाने निर्णय घेतलेला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६१६४२०२३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Hansra Salunkhe

Digitally signed by Atul Hansra Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Atul Hansra Salunkhe
Date: 2014.09.06 16:40:51 +05'30'

( डॉ. अतुल साळुंके )

राज्य संपर्क अधिकारी/ विशेष कार्य अधिकारी.

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

५) संचालक, उच्च शिक्षण, पुणे

६) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई

७) शिक्षण संचालक, शालेय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.

९) सर्व विद्यापीठांचे कुलगुरु/कुलसचिव.

१०) कार्यक्रम सल्लागार, राष्ट्रीय सेवा योजना, भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्राालय, युवक कार्य व क्रिडा विभाग, शास्त्री भवन, नवी दिल्ली.

११) संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई. (दूरदर्शन, आकाशवाणी, वृत्तपत्रे इत्यादिंच्या माध्यमाद्वारे यथोचित प्रसिध्दी देण्यासाठी)

१२) सहाय्यक कार्यक्रम सल्लागार, राष्ट्रीय सेवा योजना, विभागीय केंद्र, पुणे.

१३) कार्यक्रम समन्वयक, राष्ट्रीय सेवा योजना, सर्व विद्यापीठे.

१४) पुरस्कार निवड समितीचे सदस्य.

१५) पुरस्कार प्राप्त कार्यक्रम अधिकारी व त्यांच्या महाविद्यालयांचे प्राचार्य

१६) पुरस्कार प्राप्त विद्यार्थी

१७) निवडनस्ती, साशि-७